कोकण प्रदेशातील रायगड,रत्नागिरी , सिंधुदूर्ग जिल्ह्यातील पूरप्रतिबंधक कामे व नदी सुधारणा करणेकामी यांत्रिकी विभागाकरीता संयंत्रे खरेदीसाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :पुरक /११२१/(प्र.क्र.८१/२१-भाग-१) /यांत्रिकी**
**मंत्रालय,मुंबई -४०० ०३२.**
**दिनांक: १७ डिसेंबर, २०२१**

**संदर्भ**:-१.उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/ भाग-III / उद्योग-४, दिनांक-०१.१२.२०१६
२. शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम,भाग-२ दि.१७.०४.२०१५
३. शासन पत्र क्रमांक : पूरक-११२१ /(प्र.क्र.८१/२१ )/यांत्रिकी दि. ०९.१२.२०२१
४. मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. जा. क्र. मुअयां/तां. १ अ/२२५८/२०२१, दि.१०.१२.२०२१

**प्रस्तावना:-**

सन २०२१ च्या पावसाळा कालावधीत कोकण प्रदेशात अतिवृष्टीमुळे वाशिष्टी नदी ,सावित्री नदी ,व इतर नद्यांना मोठ्या प्रमाणात पुर आला होता. त्याचबरोबर रायगड,रत्नागिरी व सिंधुदुर्ग जिल्ह्यातील अनेक नद्यांना महापूर आल्याने नागरी वस्तीत पूराचे पाणी शिरून मोठ्या प्रमाणात वित्तीय व जिवित हानी झाली होती.सह्याद्रीच्या डोंगरावरुन वर्षोनुवर्षे पावसाच्या पाण्याच्या प्रवाहासोबत माती,राडारोडा ,दगडगोटे,यामुळे नद्यांची तळपातळी वाढली आहे.तसेच नैसर्गिक प्रवाहाला अडथळे निर्माण झालेले आहेत. पूरवहन सुरळीत होणेसाठी नदीपात्रातील गाळ बेटे काढणे,नदीपात्राचे सरळीकरण करणे,नदीवर आवश्यक तेथे मातीचे बांध घालणे ही कामे आपत्ती निवारणार्थ तातडीने करणे आवश्यक आहे.

मा.उपमुख्यमंत्री महोदय यांचे समवेत दि. २७.१०.२०२१ व दि.१५.१२.२०२१ रोजी पूर परिस्थितीवर उपाययोजना करण्यासाठी तसेच जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण अंतर्गत कामे हाती घेणेबाबतचे निर्देश देण्यात आले आहेत. त्याकरीता जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी विभागासाठी मशिनरी ( संयंत्रे ) वापरुन ही कामे करण्यात यावीत.तसेच कामाची व्याप्ती पाहता आवश्यक ती मशिनरी (संयंत्रे) खरेदी करावी असे निर्देश प्राप्त झालेले आहेत.जलसंपदा विभागांतर्गत अस्तित्वात असलेली मशिनरी व राज्यभरातील कामे याचा विचार करता नव्याने मशिनरी खरेदी करणे आवश्यक ठरते.त्यानुषंगाने संदर्भ क्र.४ अन्वये मुख्य अभियंता (यांत्रिकी) यांनी प्रस्ताव सादर केला होता . उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/ भाग-III / उद्योग-४, दिनांक-०१.१२.२०१६ मधील मुद्दा क्र.२.१३ नुसार संयंत्रे खरेदीसाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्र.४ च्या अन्वये प्रस्ताव व उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय क्र. २ मधील अ.क्र ३ नियम क्र.७ नुसार प्रस्तावित नवीन संयंत्रे खरेदी करण्याच्या (एकूण ४४ नग) करिता रु. १५.६२ कोटी अंदाजित किंमतीच्या प्रस्तावास पुढील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर संयंत्रे खरेदी प्रशासकीय मान्यता मिळालेल्या दिनांकापासुन एक वर्षाच्या आत खरेदी करण्यात यावी.
२. सदर यंत्रसामुग्री जलसंपदा विभागाच्या प्रकल्पाची / पूरप्रतिबंधक कामे/ दुष्काळ निवारण कामासाठी वापरण्यात यावीत.
३. सदर यंत्रसामुग्री खरेदीबाबत जलसंपदा विभागाचा शासन निर्णय क्रमांक समिती-०११६/( प्र. क्र.२१/२०१६)/यांत्रिकी, दि. ३.२.२०१६ च्या शासन निर्णयातील निर्देशानुसार विहित पद्धतीने

राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीमार्फत कार्यवाही व्हावी.सदर खरेदीचे कार्यादेश देण्यापुर्वी वित्त विभागाची मान्यता घेण्यात यावी.

४. सदर खरेदीबाबत उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/ भाग-III / उद्योग-४, दिनांक-०१.१२.२०१६ मधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

५. सदर संयंत्रे खरेदी ४७०१-७१६४-५२ व ४७०१ ७२०२-५२ या लेखाशिर्षातंर्गत निधी मधुन करण्यात यावी.

| अ.क्र. | सयंत्रे तपशील | मंडळ कार्यालय | क्षमता (घ.मी.) | नग |
|---|---|---|---|---|
| १ | ३०/३५ टन एस्कॅव्हेटर | पुणे | १.८ | १ |
| | | कोल्हापूर | १.८ | १ |
| २ | २०/२२ टन एस्कॅव्हेटर | पुणे | ०.९ | ६ |
| | | कोल्हापूर | ०.९ | ६ |
| ३ | टिप्पर | पुणे | १४ | १५ |
| | | कोल्हापूर | १४ | १५ |
| | **एकूण** | | | ४४ |

सदर यंत्रसामुग्री प्रापणासंबंधी प्रचलित नियमानुसार कार्यवाही करावी, GeM / ई-टेंडरिंग इत्यादी शासनाच्या प्रचलित प्रापण पद्धतीचा अवलंब करून व्यापक प्रसिद्धीसह प्रापणाची पारदर्शक कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२११२२२१२१४२२१२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANASI S KATKAR

Digitally signed by MANASI S KATKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=dd6fa08503ed40eff74e4c91c3cf375a7676068166ea85e4e9b72b3583073be9, pseudonym=BF980870C851E4712DAE33F099343AD60BDF3C25, serialNumber=1B711C43AADDD0D46D9B6F7448C380D15427E86B7DC1C5717D1E29493730F82B, cn=MANASI S KATKAR
Date: 2021.12.22 12:15:53 +05'30'

**( मानसी काटकर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत -:**

१. मा.मंत्री (जलसंपदा विभाग) यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री (जलसंपदा विभाग) यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान सचिव (जलसंपदा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई-३२.
४. सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
५. सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
६. सर्व मुख्य अभियंता व सहसचिव / सर्व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
७. सर्व कार्यकारी संचालक,जलसंपदा विभाग.
८. सर्व मुख्य अभियंता जलसंपदा विभाग.
९. अधीक्षक अभियंता यांत्रिकी मंडळ नाशिक /नागपूर / पुणे /नांदेड/कोल्हापुर.
१०. सर्व कार्यकारी अभियंता (यां.) जलसंपदा विभाग.
११. यांत्रिकी कार्यासन संग्रहार्थ.